संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान अंतर्गत राज्य स्तरीय तपासणी समितीची पुनर्रचना करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा -२०२३/प्र.क्र.४२/पापु-०८**

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: २३ जून, २०२३.

**वाचा :-**

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्रमांक: संगाग्रा-२०१९/प्र.क्र.८७/पापु-१६, दिनांक २३ जुलै, २०१९ व दिनांक २५ नोव्हेंबर, २०२१
२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन शुध्दीपत्रक क्रमांक: संगाग्रा-२०१९/प्र.क्र.८७/पापु १६, दिनांक २० जून २०२२
३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांक: संगाग्रा-२०२२/प्र.क्र.३३/पापु १६, दिनांक ०७ ऑक्टोंबर २०२२
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यालयीन आदेश क्रमांक: आस्था १९२३/प्र.क्र.१२/पापु ०१, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२३

**प्रस्तावना:-**

सन २०१९-२० या वर्षातील संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाच्या अनुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दिनांक २३ जुलै २०१९ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सन २०२०-२१ व सन २०२१-२२ या दोन वर्षाच्या कालावधीकरिता एकत्रित एक स्पर्धा राबविणे बाबत आणि या स्पर्धेसाठी समितीची रचना, कार्यपध्दती, तपासणी, निकष व बक्षीसांची रक्कम दिनांक २३ जुलै २०१९ च्या शासन निर्णयानुसार लागू करणे बाबत, दिनांक २५ नोव्हेंबर २०२१ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. तसेच, सन २०२२-२३ व त्यापुढील वर्षातील संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाच्या अनुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या दिनांक ७ ऑक्टोंबर २०२२ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

वाचा क्र. २ येथील शासन शुध्दीपत्रकान्वये सन २०१९-२० ते सन २०२१-२२ या कालावधीतील तसेच, वाचा क्र. ३ येथील च्या शासन निर्णयान्वये सन २०२२-२३ व त्या पुढील वर्षातील संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाच्या अनुषंगाने राज्य स्तरीय तपासणी समिती गठीत करण्यात आली आहे.

वाचा क्रमांक ४ येथील कार्यालयीन आदेशान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागात पापु ०८ हे कार्यासन नव्याने कार्यान्वित करण्यात आले असल्याने, संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान अंतर्गत सन २०२०-२१ व २०२१-२२ या कालावधीतील एकत्रित एक स्पर्धा तसेच सन २०२२-२३ व त्यापुढील वर्षातील स्पर्धांकरीता राज्य स्तरीय तपासणी समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान अंतर्गत सन २०२०-२१ व २०२१-२२ या कालावधीतील एकत्रित एक स्पर्धा तसेच, सन २०२२-२३ व त्यापुढील वर्षातील स्पर्धांकरीता पुढील प्रमाणे राज्य स्तरीय तपासणी समिती गठीत करण्यात येत आहे:-

| क्र. | सन २०२०-२१ व २०२१-२२ या कालावधीतील एकत्रित एक स्पर्धा तसेच सन २०२२-२३ व त्यापुढील वर्षातील स्पर्धांकरीता राज्य स्तरीय तपासणी समिती | पदनाम |
|---|---|---|
| १ | सह सचिव/उपसचिव तथा अभियान संचालक (स्वच्छ भारत अभियान), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय , मुंबई | अध्यक्ष |
| २ | अवर सचिव (पापु -१६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय , मुंबई | सदस्य-सचिव |
| ३ | अवर सचिव (पापु -०८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय , मुंबई | सदस्य |
| ४ | प्रकल्प संचालक (स्वच्छ भारत अभियान) किंवा राज्य समन्वयक तथा प्रकल्प व्यवस्थापक-संनियंत्रण (स्वच्छ भारत अभियान) किंवा कार्यकारी अभियंता (सांडपाणी व घनकचरा), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर. | सदस्य |

३. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान अंतर्गत सन २०२०-२१ व २०२१-२२ या कालावधीतील एकत्रित एक स्पर्धा तसेच, सन २०२२-२३ व त्यापुढील वर्षातील सर्व स्पर्धांकरीता, राज्य स्तरीय तपासणी कार्यक्रमाची आखणी करण्याच्या अनुषंगाने, उपरोक्त समितीच्या किमान दोन बैठका आयोजित करण्यात याव्यात. सदर बैठकांमध्ये राज्य स्तरीय तपासणी कार्यक्रमाची रुपरेषा समितीचे सदस्यांना अवगत करण्यात यावी.

४. उपरोक्त समिती मधील अध्यक्ष व सदस्य यांना तपासणीसाठी उपस्थित राहणे शक्य नसल्यास, समितीचे अध्यक्ष, सदस्य सचिव व सदस्य यांच्या ऐवजी प्रतिनिधी नियुक्त करण्याचे व समितीच्या सदस्यांना द्यावयाचे भत्ते व मानधन निश्चित करण्याचे अधिकार, सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय यांना राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१९१९५९१४२८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SMITA SACHIN RANE

Digitally signed by SMITA SACHIN RANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f85d92aa99ea42eb86747707e3c3a129af986c1f95f6bc3e8165ceaf5155e6e7, pseudonym=654762901822CEA8BAF3716AD813F3010276E808, serialNumber=4B9BEFD340493837DB4CFFAFA6B96EEAF6AA3C12A7A6BF0467B0F517B724E8EE, cn=SMITA SACHIN RANE
Date: 2023.06.23 14:32:58 +05'30'

**( स्मि. स. राणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा. विधानसभा अध्यक्ष/उपाध्यक्ष व मा. विधानपरिषद सभापती/उप सभापती.
३) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव.
४) सर्व मा. मंत्री /मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मा.विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
६) जिल्हा परिषद अध्यक्षा/अध्यक्ष, सर्व.
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व, मंत्रालय, मुंबई.
९) महासंचालक माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१०) सह सचिव/उपसचिव तथा अभियान संचालक (स्वच्छ भारत अभियान), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय , मुंबई
११) विभागीय आयुक्त,विभाग सर्व
१२) जिल्हाधिकारी,सर्व.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद सर्व.
१४) उपायुक्त (विकास), सर्व.
१५) प्रकल्प संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
१६) अवर सचिव (पापु १६) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१८) निवडनस्ती.